**रुपये २५ कोटीपेक्षा जास्त किंमतीचे प्रकल्प/योजनांना मंत्रिमंडळ पायाभूत सुविधा समितीची मान्यता घेण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन,
नियोजन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : पासुस २०००/प्र.क्र.२०/का-१४७४
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक १० फेब्रुवारी २००१.

वाचा : १) शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांक : खाक्षेस १०९६/ प्र.क्र.४८/ का.१४६३, दिनांक ६ नोव्हेंबर १९९६
२) शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांक : पासुस २०००/ प्र.क्र.२०/ का-१७७४, दिनांक १५ जुलै २०००.

मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळ पायाभूत सुविधा समितीची स्थापना नियोजन विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ६-११-१९९६ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आलेली आहे. या समितीचे अधिकार पायाभूत सुविधा निर्माण करणाऱ्या प्रकल्पांना मान्यता देणे, राज्य शासनाच्या कोणत्याही विभागांना अथवा सार्वजनिक क्षेत्रांतर्गत उपक्रमांना /मंडळाना त्यांनी प्रस्तावित केलेल्या पायाभूत सुविधा संबंधी कोणत्याही बाबीविषयी मार्गदर्शक तत्वे घालून देणे आणि सल्ला देणे असे आहेत. सुरुवातीस या समितीचे कार्य औद्यागिक वसाहती, औद्योगिक संकुल (पार्क), बंदरे, विमानतळ, रस्ते, पाटबंधारे, परिवहन आणि वीज या सुविधापुरतेच मर्यादित होते.

मंत्रिमंडळ पायाभूत सुविधा समितीची स्थापना विविध पायाभूत क्षेत्रामध्ये खाजगी गुंतवणूकीस चालना देण्यासाठी निर्माण कण्यात आली होती. तथापि कालांतराने या पायाभूत विकास क्षेत्रामध्ये शासकीय महामंडळे/उपक्रमे कर्जरोखे काढून खुल्या बाजारातून निधी उभारुन पायाभूत सुविधाचे प्रकल्प मोठया प्रमाणावर हाती घेतले आहेत. या प्रकल्पांची छानननी त्याचप्रमाणे त्यास शासन स्तरावर मान्यता देण्याचा विषय हा पायाभूत सुविधा समितीच्या मूळ उद्देशास धरुन आहे.

कर्ज रोखेमुळे शासनावर कालांतराने पडणारी आर्थिक जबाबादारी विचारात घेता तसेच विविध महामंडळामार्फत घेण्यात येणारे कार्यक्रम अथवा प्रकल्प हे वार्षिक व पंचवार्षिक योजनेच्या उद्देशाला धरुन आहेत किंवा नाही या बाबी तपासून पायाभूत सुविधा समितीसमोर

सादर होणे आवश्यक आहे. या सर्व कारणामुळे विविध महामंडळे/ उपक्रमे यांच्या मार्फत प्रकल्प प्रत्यक्ष कर्जरोखेव्दारे उभारलेल्या निधीतून हाती घेण्यापूर्वी पायाभूत सुविधा समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. संबंधित महामंडळाच्या कार्य नियमावलीतील तरतूदीनुसार संचालक मंडळाला कोणताही प्रकल्प घेण्याचे अधिकार असले तरी शासनाची मोठी बांधिलकी विचारात घेऊन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे :-

**शासन निर्णय :**

(१) विविध महामंडळे व उपक्रमे यांनी रोखेव्दारा उभारलेल्या निधीतून रुपये २५ कोटीपेक्षा जास्त किंमतीचे प्रकल्प हाती घेण्यापूर्वी मंत्रिमंडळ पायाभूत सुविधा समितीची मान्यता घेणे बंधनकारक राहील.

(२) महामंडळे/ उपक्रमे यांच्या २५ कोटी रुपयांपेक्षा जास्त किंमतीचे प्रकल्प संबंधित प्रशासकीय विभाग, नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या अभिप्रायासह पायाभूत सुविधा समितीच्या मान्यतेसाठी सादर करावेत. प्रस्ताव सादर करण्यासंबंधी मार्गदर्शक सूचना नियोजन विभागाकडून स्वतंत्ररित्या काढण्यात येतील.

(३) कोणतीही महामंडळे किंवा उपक्रमे यांचे कर्जरोखे उभारण्यासंबंधीचे प्रस्ताव उच्चाधिकार समितीसमोर सादर करताना संबंधित प्रशासकीय विभागांनी या शासन निर्णयानुसार २५ कोटी रुपयेपेक्षा जास्त किंमतीच्या प्रकल्पास संबंधित महामंडळे किंवा उपक्रमे यांनी पायाभूत सुविधा समितीची पूर्व परवानगी घेतली असल्याचा दाखला सादर करावा.

(४) महामंडळ/ उपक्रमे यांनी यापूर्वी हाती घेतलेल्या २५ कोटी रुपयेपेक्षा जास्त किंमतीच्या प्रकल्पांची आवश्यक संपूर्ण माहिती पायाभूत सुविधा समितीसमोर सादर करुन त्यास समितीची कार्योत्तर मंजूरी घेण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(अशोक बसाक)
शासनाचे प्रधान सचिव

प्रति,
मा.मुख्यमंत्री,
मा. उप मुख्यमंत्री,
मा. मंत्री, वित्त व नियोजन,
मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम,